रासायनिक खताचा संरक्षित साठा करण्याकरीता लागणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांना निधी उपलब्ध करुन देण्याबाबत-

**महाराष्ट्र शासन**

**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः सपस-२०१५/प्र.क्र.६७/२४ स,**

मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, विस्तार, मुंबई-४०० ०३२
दिनांक: - १३ फेब्रुवारी, २०१७

वाचा :-

१. शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग,
   क्रमांक:-राखते२०१-३अे-१७/८८.क्र.प्र/, दिनांक ३१ मे२०१३ ,
२. शासन निर्णय, वित्त विभाग,
   क्रमांक:- शाहमी२०१-३ /सपववअर्थबळ /४२ .क्र.प्र/, दिनांक २५७.२०१३.
३. शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
   क्रमांक:- सपस-२०१३/प्र.क्र.१८४/२४- स, दिनांक १४.२.२०१४
४. शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
   क्रमांक:- सपस-२०१३/प्र.क्र.१८४/२४- स, दिनांक २९.३.२०१४
५. शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
   क्रमांक:- सपस-२०१४/प्र.क्र.२१/२४- स, दिनांक २९.३.२०१४
६. शासन निर्णय,सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
   क्रमांक:- सपस-२०१४/प्र.क्र.६७/२४- स, दिनांक १९.३.२०१५
७. शासन परिपत्रक, वित्त विभाग,
   क्रमांक:- अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक २०/४/२०१६
८. सरव्यवस्थापक (खत), दि महाराष्ट्र स्टेट को- ऑपरेटिव्ह मार्केटिंग फेडरेशन लि., मुंबई यांचे पत्र जा.नं. खत/ अनुषंगिक खर्च/ २०१६-१७/३०९, दिनांक ५.१.२०१७

**प्रस्तावना :-**

खरीप हंगाम २०१३ करिता राज्यातील शेतकऱ्यांना त्यांच्या मागणीनुसार वेळेवर रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन पुरवठा करण्याकरिता महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेची उपरोक्त संदर्भाधीन **अ.क्र.१** नुसार नोडल एजन्सी म्हणून नियुक्ती करण्यात आली होती. या कामाकरिता आवश्यक असणाऱ्या कर्जासाठी शासन हमी तसेच अनुषंगीक खर्च या विभागाने उपलब्ध करुन देण्याचा निर्णय कृषि विभागाने घेतला होता. या करिता लागणाऱ्या रु. १४०.०० कोटी रक्कमेच्या कर्जाकरिता वित्त विभागाने शासन हमी संदर्भाधीन **अ.क्र.२** नुसार मंजूर केली होती. सदर रासायनिक खताचा साठा व पुरवठा करण्याकरिता आलेल्या एकूण अनुषंगिक खर्चापैकी (रुपये १,३१,६२,३५२/- ) **अ.क्र. ६** च्या शासन निर्णयान्वये रु. १,२१,७९,७७६/- (रुपये एक कोटी एकवीस लाख एकोणऐंशी हजार सातशे शहात्तर फक्त ) निधी पणन महासंघास

उपलब्ध करुन दिलेला आहे. सदर योजनेच्या लेखाशिर्षातर्गत सन २०१६-२०१७ च्या अर्थसंकल्पात रुपये १४.४१ कोटी रकमेची तरतूद करण्यात आली आहे. या अर्थसंकल्पिय तरतूदीपैकी पणन महासंघास उर्वरित प्रतिपूर्ती रक्कम रुपये १०,१८,८५८/- (रुपये दहा लाख अठरा हजार आठशे अठ्ठावन्न फक्त ) इतका निधी अर्थसंकल्प वितरण प्रणालीद्वारे वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

खरीप हंगाम २०१३ साठी राज्यातील शेतकऱ्यांना वेळेवर रासायनिक खताचा संरक्षित साठा करुन पुरवठा करण्यासाठीच्या योजनेअंतर्गत आलेल्या खर्चापैकी उर्वरित प्रतिपूर्ती रक्कम रुपये १०,१८,८५८/- (रुपये दहा लाख अठरा हजार आठशे अठ्ठावन्न फक्त ) इतकी रक्कम महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई या संस्थेस अदा करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर खर्च सन २०१६-२०१७ च्या खालील लेखाशीर्षाखाली मंजूर असलेल्या तरतुदीतून भागविण्यात यावा:-

"मागणी क्र. व्ही-२,
मुख्य लेखाशिर्ष २४२५, सहकार,
(००)(१०८), इतर सहकारी संस्थांना सहाय्य,
(०१) पणन सहकारी संस्था,
(०१)(२१) महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघास रासायनिक खते खरेदी व पुरवठा यासाठी येणाऱ्या अनुषंगिक खर्चासाठी अर्थसहाय्य (योजनेतर) (२४२५ २३७३)
३३ अर्थसहाय्य".

३. या शासन निर्णयान्वये मंजूर केलेल्या अर्थसहाय्याचा विनियोग ज्या कारणास्तव मंजूर केलेला आहे त्याच कारणासाठी वापर करुन संबंधित फेडरेशनने त्यासंबंधीचा अनुपालन अहवाल विनाविलंब शासनास सादर करावा.

४. या शासन निर्णयानुसार मंजूर करण्यात आलेल्या रुपये १०,१८,८५८/- (रुपये दहा लाख अठरा हजार आठशे अठ्ठावन्न फक्त ) चा धनादेश महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मुंबई यांच्या नावे काढण्यात यावा.

५. या शासन निर्णयातील मंजूर करण्यात आलेल्या रकमेचे आहरण करुन संबंधितांना वितरीत करण्याकरीता श्रीमती र.गं. बोड्डू, कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना आहरण व संवितरण अधिकारी व श्री. का.गो.वळवी, उपसचिव (पणन/V००१०), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई-३२ यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

६. सदरचा शासन निर्णय वित्त विभागाचे परिपत्रक, क्र अर्थसं-२०१६/प्र.क्र. ८९/अर्थ-३, दिनांक २०/४/२०१६ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. वित्त विभागाच्या दिनांक २०/४/२०१६ च्या परिपत्रकातील परिच्छेद क्र. ७ ते १८ मधील अटी तसेच दिनांक १०/५/२०१६ च्या परिपत्रकातील १ ते ९ अटींची पूर्तता होत असल्याचे प्रमाणित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०२१३१११८१४६२०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Sunanda M Ghadyale

Digitally signed by Sunanda M Ghadyale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Co-operation, Marketing And Textiles Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd89208cbc27b202c96467165ac5bc9643515d80ba9edecaf650dad6e8311b45, serialNumber=c5adff2513f33afa9ed70c79c5a4636204d8bb4040bf2c6c2470d0f20d8dc79d, cn=Sunanda M Ghadyale
Date: 2017.02.13 11:22:55 +05'30'

**(सुनंदा मो. घड्याळे)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**
**सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग**

**प्रत,**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता), (लेखापरिक्षा), मुंबई,
२. अपर मुख्यसचिव (कृषी व पणन) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
३. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य सहकारी पणन महासंघ मर्या., मस्जीद, मुंबई-९,
४. कृषि आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
५. सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, महाराष्ट्र राज्य, पुणे,
६. कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य, पुणे,
७. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
८. निवासी लेखापरिक्षा अधिकारी, मुंबई,
९. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,
१०. वित्त विभाग, (व्यय-२, अर्थसंकल्प-३ व १३), मंत्रालय, मुंबई,
११. मा.मंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१२. मा.राज्यमंत्री (पणन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
१३. कार्यासन अधिकारी (रोख शाखा), सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग (३ प्रती),
१४. कक्ष अधिकारी, १७ स/संगणक कक्ष, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग,
१५. निवडनस्ती.